सामाजिक सहभागाव्दारे ग्रामीण महिलांना सक्षम बनविण्यासाठी केंद्र पुरस्कृत नवीन "महिला शक्ती केंद्र" योजना केंद्र : राज्य हिश्श्याच्या ६०:४० प्रमाणात राबविण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७५/का-१०**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-२९ जानेवारी, २०१९.

वाचा :- १. केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालयाचे पत्र क्र.WW-२६/२०/२०१७-WW, दि.२२.१२.२०१७.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१०/प्र.क्र.२१७/का.२, दि.१७ ऑगस्ट, २०१३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.२२.१२.२०१७ रोजीच्या पत्रानुसार समाजातील सहभागाव्दारे ग्रामीण महिलांना सक्षम बनविण्यासाठी आणि त्यांना त्यांच्या पूर्ण क्षमतेची जाण असलेले वातावरण तयार करुन देण्यासाठी केंद्र शासनाने प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र (MSK) या नावाने एक नवीन योजना केंद्र व राज्याच्या ६०:४० प्रमाणात राज्यात कार्यान्वित करण्यास मान्यता दिली आहे. या योजनेंतर्गत विद्यार्थी स्वयंसेवक परिवर्तनाचे दूत (Agent of Change) म्हणून काम करणार असून त्यांच्यामार्फत ग्रामीण भागातील महिलांच्या समुदायावर कायमस्वरुपी प्रभाव पडणार असून राष्ट्र उभारणीत या विद्यार्थ्यांचे अमूल्य असे योगदान होणार आहे.

२. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार "केंद्र पुरस्कृत नवीन "महिला शक्ती केंद्र" योजनेंतर्गत राज्यस्तरावर १ महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW), जिल्हा स्तरावरील २६ बेटी बचाओ-बेटी पढाओ (BBBP) जिल्ह्यांत महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्र (DLCW) तसेच निती आयोगाकडून निवड करण्यात आलेल्या राज्यातील नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली या ४ आकांक्षित (Aspirational Districts) जिल्हयांत गट/ तालुका स्तरीय समिती (BLC) राज्यात स्थापन करण्याचे निदेश आहेत. त्यानुसार प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र (MSK) ही योजना राज्यात कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रधानमंत्री महिला सशक्तीकरण योजना (PMMSY) या योजनेंतर्गत कौशल्य विकास, रोजगार, डिजीटल साक्षरता, आरोग्य आणि पोषण या संधी एकत्रितरित्या पुरवून ग्रामीण महिलांचे सक्षमीकरण करण्याच्या अनुषंगाने महिला शक्ती केंद्र (MSK) ही उपयोजना केंद्र व राज्य हिश्श्याच्या ६०:४० प्रमाणात राबविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या अंमलबजावणी मार्गदर्शिकेतील सूचनांनुसार सदर योजना राज्यात कार्यान्वित करण्याकरिता राज्यस्तरावरील महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र, जिल्हा पातळीवर महिलांसाठी केंद्र, तालुका/ गट पातळीवर तालुका स्तरीय समिती आणि गट स्तरीय महिला शक्ती केंद्रे स्थापन करुन त्यांची रचना, कार्यपध्दती, कार्ये, उपक्रम, देखरेख यंत्रणा व आर्थिक तरतूद या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहेत.

अ) **महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) :-** राज्य स्तरावरील महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) हे राज्य शासनांतर्गत महिलांसाठी असलेले कार्यक्रम/ कायदे व योजना यांच्या प्रभावी समन्वयातून अंमलबजावणीसाठी तांत्रिक सहाय्य करतील. तसेच सध्या अस्तित्वात असलेले धोरण, कार्यक्रम आणि कायदे यांचे मूल्यांकन तसेच आढावा घेण्याचे काम करतील. सदर केंद्र हे महिला व बाल विकास विभागांतर्गत महिला आर्थिक विकास महामंडळ यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत राहील.

१) महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) ची **रचना** खालीलप्रमाणे :-

केंद्र शासनाने महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्राच्या कार्यालयीन कामासाठी ०५ पदे मंजूर केली आहेत. सदर पदे ही महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत सचिव, महिला व बाल विकास विभाग यांच्या मान्यतेने कंत्राटी पध्दतीने भरण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर कर्मचारी पुढील आदेश होईपर्यंत महिला आर्थिक विकास महामंडळाच्या कार्यालयात कार्यरत राहतील. त्यांच्यावरील प्रशासकीय नियंत्रण व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ यांचे राहील. महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्राच्या आस्थापनेवरील मंजूर कर्मचारी यांची नियुक्ती करण्याचे किंवा नियुक्ती रद्द करण्याचे अधिकार सचिव, महिला व बाल विकास विभाग यांना राहतील.

- महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्राच्या ०५ पदांची भरती करताना पदनिहाय वेतन, पात्रता, अनुभव व वयोमर्यादा खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | पदनाम व वेतन | पदांची संख्या | शैक्षणिक पात्रता, अनुभव व वयोमर्यादा |
|---|---|---|---|
| १ | राज्य प्रकल्प समन्वयक (₹५२,५००/- प्रतिमाह) | ०१ | • समाजकार्य/अर्थशास्त्र/ महिलांविषयीचा अभ्यास/ विधी/ लोक प्रशासन किंवा तत्सम क्षेत्रातील पदव्युत्तर पदवी (संबंधित क्षेत्रामध्ये डॉक्टरेट (PhD) केली असल्यास प्राधान्य देण्यात येईल.)<br>• महिला समस्यांबाबतच्या कार्याचा किमान ०५ वर्षे तसेच प्रकल्प किंवा गट नेतृत्वाचा किंवा व्यवस्थापनाचा ०३ वर्षाचा अनुभव.<br>• संगणकावर MS Office प्रणालीमध्ये काम करण्यास सक्षम.<br>• वयोमर्यादा ४५ ते ५० वर्षे. |
| २ | लिंग विशेषज्ञ (Specialist Gender) (₹३६,७५०/- प्रतिमाह) | ०१ | • समाजकार्य/ समाजशास्त्र/ अर्थशास्त्र/ महिलांविषयीचा अभ्यास/ विधी/ लोक प्रशासन किंवा तत्सम क्षेत्रातील पदव्युत्तर पदवी.<br>• महिला समस्या आणि सार्वजनिक आरोग्य याविषयक कार्याचा किमान ०१ वर्षे अनुभव आवश्यक.<br>• वयोमर्यादा ३५ ते ४५ वर्षे. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | संशोधन अधिकारी<br>(₹ २६,२५०/- प्रतिमाह) | ०१ | • समाजकार्य/ अर्थशास्त्र/ महिलांविषयीचा अभ्यास/ विधी/ प्रशासन किंवा तत्सम क्षेत्रातील पदव्युत्तर पदवी<br>• संशोधन आणि महिलांविषयक बाबींच्या क्षमता बांधणी कार्याचा किमान ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>• संगणकावर MS Office प्रणालीमध्ये काम करण्यास सक्षम. Data Analysis Packages- SPSS, STATA etc.<br>• वयोमर्यादा कमाल ४५ वर्षे. |
| ४ | प्रशिक्षण आणि संशोधन अधिकारी<br>(₹ २६,२५०/- प्रतिमाह) | ०१ | • समाजकार्य/ अर्थशास्त्र/ महिलांविषयीचा अभ्यास/ विधी/ प्रशासन किंवा तत्सम क्षेत्रातील पदव्युत्तर पदवी<br>• संशोधन आणि महिलांविषयक बाबींच्या क्षमता बांधणी कार्याचा किमान ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>• संगणकावर MS Office प्रणालीमध्ये काम करण्यास सक्षम.<br>• वयोमर्यादा कमाल ४५ वर्षे. |
| ५ | सहायक<br>(₹ १५,७५०/-प्रतिमाह) | ०१ | • वाणिज्य शोखतील पदवी आणि अशासकीय संस्था, खाजगी संस्था किंवा शासकीय संस्था यातील लेखा विषयक कार्याचा ०३ वर्षाचा अनुभव किंवा वाणिज्य शाखेतील पदव्युत्तर पदवी.<br>• वयोमर्यादा कमाल ३५ वर्षे. |

२) महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) ची **कार्यपध्दती** खालीलप्रमाणे :-

i. राज्यस्तरावरील महिला केंद्रित योजनांच्या (One Stop Center, Women Helpline, महिला पोलीस स्वयंसहायक, इ.) प्रभावी अंमलबजावणीसाठी तांत्रिक संघटन म्हणून काम करणे. तसेच या योजनांच्या कार्यक्षमता वाढीसाठी आवश्यक त्या उपाययोजना करणे.

ii. जिल्हा तसेच गट/ तालुका स्तरावर बेटी बचाओ-बेटी पढाओ आणि महिला शक्ती केंद्र यांना तांत्रिक तसेच समन्वय सहाय्यक म्हणून राज्यस्तरीय संनियंत्रण केंद्र (Project Management Unit- PMU) म्हणून काम पाहणे .

iii. महिलांवर प्रभाव पाडणारे, विद्यमान व प्रचलित निर्णय, धोरण, कार्यक्रम व कायदे यांचा वेळोवेळी आढावा व मुल्यांकन करुन योग्य त्या शिफारसी राज्य शासनास सादर करणे.

iv. लिंगभाव विषयक संवेदनशील प्रशिक्षण आणि क्षमता बांधणी मोड्यूलची निर्मिती व अंमलबजावणी करणे.

- सदर प्रशिक्षण मोड्यूलची आखणी करताना वेगवेगळे हितसंबंध असणाऱ्या घटकांचा विचार करण्यात येईल. (जसे. लोकनिर्वाचित प्रतिनिधी, शासकीय अधिकारी, स्टाफ, एकत्रित महिला सदस्य, व्यक्तीनिहाय घटक इ.)
- प्रशिक्षणासाठी आवश्यक घटक. (जाणीव निर्मिती, संवेदनशिलता, तांत्रिक कौशल्य, वागणूकीतील बदल.)
- प्रशिक्षण देण्याची पध्दती (प्रत्यक्ष किंवा एजन्सी मार्फत)

**३)** महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) मार्फत राबविण्यात येणारे **उपक्रम** खालीलप्रमाणे **:-**

i. राज्याच्या महिला व बाल विकास विभागाच्या पूर्वसंमतीने राज्यांतर्गत महिला संदर्भातील विशिष्ट प्रश्नांसंदर्भात कृती आराखडा तयार करणे.

ii. शासकीय कार्यक्रम, योजना, सेवा यांच्या एकत्रिकरणात अस्तित्वात असलेल्या किंवा उद्भवू शकणाऱ्या अडचणी ओळखणे.

iii. योजना किंवा कायद्याच्या रचना, कार्यपध्दती, अंमलबजावणीसाठी शासनाचे वेगवेगळे विभाग, एजन्सीज, यंत्रणा यांच्यात समन्वय साधणे.

iv. जिल्हास्तरीय महिला केंद्र (DLCW) आणि गट/ तालुका स्तरावरील उपक्रम यांच्या अंमलबजावणीवर देखरेख ठेवणे.

v. लिंगभाव विषयक शासकीय योजनांच्या अंमलबजावणीसाठी विद्यमान यंत्रणा आणि रचनांशी देखरेख आणि पुनरावलोकनाच्या दृष्टीने संपर्क ठेवणे.

vi. महिला सक्षमीकरणाच्या उन्नतीसाठी पंचायत राज संस्था, नागरी सेवा संघटन आणि खाजगी क्षेत्र यांच्याशी भागीदारीचे प्रतिमान विकसीत करणे.

vii. लिंगभाव विषयक दृष्टीकोनातून वेगवेगळ्या क्षेत्रांमधील आरोग्य, शिक्षण, सुक्ष्म वित्त, आजिविका इ. सर्वोत्तम पध्दती ओळखणे व त्यांचा राज्यात प्रसार करणे. (शासन, नागरी सेवा संघटन, पंचायत राज संस्था)

viii. राज्यातील महिला केंद्रीत कार्यक्रम आणि योजनांच्या (DLCW/ MSK यांच्यासह) अंमलबजावणी बाबतची सद्यस्थिती विषयक अहवाल वेळोवेळी सादर करणे.

ix. महिला सक्षमीकरणाच्या कामांच्या प्रांतातील सर्वोत्तम पध्दती विषयक माहितीचा राष्ट्रीय माहिती संग्रहालयात (National Repository of Information) समावेश करणे.

**४) राज्यस्तरीय देखरेख यंत्रणा :-** महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) कार्यपध्दतीच्या देखरेख व अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय कार्यदल (Task Force) स्थापना करण्यात येणार असून त्याची रचना व कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील.

- **रचना :-**

i. प्रधान सचिव/ सचिव, महिला व बाल विकास विभाग - अध्यक्ष
ii. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे - सदस्य
iii. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग - सदस्य
iv. प्रधान सचिव/ सचिव, महसूल व वन विभाग यांचे प्रतिनिधी - सदस्य
v. प्रधान सचिव/ सचिव, ग्राम विकास विभागद यांचे प्रतिनिधी - सदस्य
vi. प्रधान सचिव/ सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचे प्रतिनिधी - सदस्य
vii. प्रधान सचिव/ सचिव, कौशल्य विकास विभाग यांचे प्रतिनिधी - सदस्य
viii. प्रधान सचिव/ सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे प्रतिनिधी - सदस्य
ix. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांचे प्रतिनिधी - सदस्य
x. उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - सदस्य
xi. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ - सदस्य सचिव

- **कार्यपध्दती :-**

i. महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) कार्यपध्दतीची देखरेख, समन्वयन, आढावा, पुनर्विलोकन व कार्य सुधारणा करणे.

ii. महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्राने (SRCW) राबविलेल्या उपक्रमांचा प्रगती अहवालासोबत केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व खर्चाचे विवरणपत्र आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी महिला व बाल विकास विभाग व केंद्र शासनास सादर करणेबाबतची कार्यवाही करणे.

५) **आर्थिक तरतूद :-** महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) साठी केंद्र शासनाच्या अंमलबजावणी मार्गदर्शिकेनुसार खालीलप्रमाणे वार्षिक खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| **महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) साठी आर्थिक विवरणपत्र (वार्षिक)** | | | | |
|---|---|---|---|---|
| **आवर्ती खर्च :-** | | | | |
| **अ** | **वेतन* खर्च**** | | | |
| | **पदाचे नाव** | **पदांची संख्या** | **प्रतिमाह वेतन (रुपये)** | **वार्षिक तरतूद (रुपये)** |
| | राज्य प्रकल्प समन्वयक | ०१ | ५२,५०० | ६,३०,००० |
| | लिंग विशेषज्ञ | ०१ | ३६,७५० | ४,४१,००० |
| | संशोधन अधिकारी | ०१ | २६,२५० | ३,१५००० |
| | प्रशिक्षण आणि संशोधन अधिकारी | ०१ | २६,२५० | ३,१५००० |
| | सहायक | ०१ | १५,७५० | १,८९,००० |
| | **एकूण** | **०५** | | **१८,९०,०००** |
| **ब** | **कार्यालयीन खर्च***** | | | **१०,००,०००** |
| | **एकूण** | | | **१०,००,०००** |
| **क** | **कार्यक्रमांतर्गत उपक्रम** | | | |
| | व्याख्यान व कार्यशाळा, सल्ला विनिमय, प्रशिक्षण, प्रकाशन, नाविन्यपूर्ण प्रकल्प, MIS | | | **८,००,०००** |
| | (Information, Education & Communication) IEC उपक्रम | | | **२,००,०००** |
| | **एकूण** | | | **१०,००,०००** |
| | **एकूण स्थूल (अ+ब+क)** | | | **३८,९०,०००** |

* उपरोक्त पदे ही प्रतिनियुक्तीने राज्य शासकीय सेवेतील पदांमधून भरण्यात आल्यास अतिरिक्त आर्थिक बोजा महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्रावर न पडण्याच्या अटीच्या अधीन राज्य शासनाचे प्रतिनियुक्तीचे नियम लागू होतील.

** राज्य सरकार अधिक मानधन देऊ शकते, परंतु विवरणपत्रात नमूद केलेल्या रकमेइतकाच केंद्र सरकारचा वाटा राहील. केंद्र हिश्श्यामध्ये बदल केला जाणार नाही.

*** भाडे खर्च/ स्टेशनरी, संपर्क (प्रवास खर्चासह), सचिवालय/ कार्यात्मक गरजेनुसार कंत्राटावर नेमलेला सहायक स्टाफ इ. वार्षिक देखभाल खर्च (सुरक्षा सेवा, स्वच्छता सेवा, विज व पाण्यावरील खर्च इ.) सचिवालय, कंत्राटावर नेमलेला सहायक स्टाफ, कार्यात्मक गरजेनुसार मुक्त बाजारपेठ किंवा एजन्सीमार्फत भाडे तत्वावर नेमण्यासाठी वित्तीय तरतूद करण्यात आली आहे.

**महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) साठी एकरकमी अनावर्ती खर्च ***

| अ.क्र. | अनावर्ती अनुदान (शिर्ष) | वार्षिक तरतूद (रुपये) |
|---|---|---|
| I | अ) कार्यालयीन फर्निचर | १,००,००० |
| | ब) संगणक, प्रिंटर व UPS (०२) | १,२०,००० |
| | क) फॅक्स मशीन | १०,००० |
| | ड) झेरॉक्स मशीन | २,००,००० |
| | • दूरध्वनी | ४,००० |
| | **एकूण** | **४,३४,०००** |

* महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) अंतर्गत अद्यापपर्यंत उपरोक्त अनावर्ती बाबींवर खर्च केला नसल्यास सदर तरतूद देय राहील.

राज्यस्तरीय संनियंत्रण केंद्रावरील (Project Management Unit- PMU) खर्च (BBBP)

| अ.क्र. | बाब | अर्थसंकल्पीय मर्यादा (रुपये) |
|---|---|---|
| I | i. आंतरक्षेत्रीय सल्ला विनिमय/ बैठका आणि राज्य कार्य दलांच्या बैठका<br>कार्यदलाच्या त्रैमासिक बैठका (मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली, संबंधित विभागांच्या आणि नागरी सेवा संघटनांच्या प्रतिनिधींसह)<br>ii. प्रशिक्षण आणि क्षमता बांधणी- अभिमुखता आणि संवेदनशिलता (Orientataion & Sensitization)<br>आमदार, संसद सदस्य, न्याय पालिका, पोलीस, IMA-State Chapter, वैद्यकीय व्यवसायिक, कॉर्पोरेट क्षेत्र, शाळा- महाविद्यालयीन अध्यापक, राज्य विधी सेवा प्राधिकरण, सोनोग्राफी यंत्र निर्माते,<br>iii. नानिन्यपूर्णता आणि जन जागृती उपक्रम (उदा. मासिक बालिका दिवस साजरा करणे, बालिका दिवस साजरा करताना सर्वोत्तम पध्दती निवडल्याबद्दल वार्षिक कार्यक्रमात जिल्हयाचा गौरव करणे.) | १९,३५,००० |
| II | देखरेख, मुल्यांकन, अभिलेखीकरण | ३,००,००० |
| III | Flexi Fund (१०%) | २,२३,५०० |
| | **एकूण** | **२४,५८,५००** |

**ब) महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्र (DLCW) :-** केंद्र शासनाच्या अंमलबजावणी मार्गदर्शिकेतील परिशिष्टात नमूद राज्यातील बीड, जळगांव, अहमदनगर, बुलढाणा, औरंगाबाद, वाशिम, कोल्हापूर, उस्मानाबाद, सांगली, जालना, हिंगोली, सोलापूर, पुणे, परभणी, नाशिक, लातूर, मुंबई उपनगर, मुंबई शहर, यवतमाळ, ठाणे, नागपूर, रायगड, अमरावती, रत्नागिरी, नंदुरबार आणि गडचिरोली अशा एकूण २६ बेटी बचाओ- बेटी पढाओ जिल्ह्यात महिलांसाठी केंद्र (District Level Center For Women) स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

ही केंद्रे जिल्हाधिकारी कार्यालय, जिल्हा परिषदेच्या आवारात कार्यरत राहतील. ही केंद्रे जिल्हाधिकारी/ उप आयुक्त यांच्या मार्गदर्शनाखाली तसेच जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी, कायदा पालक यंत्रणा, अर्धशासकीय यंत्रणा, इतर विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने महिलांसाठी असलेल्या योजना आणि कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी काम करतील. तसेच महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) याचे अंग म्हणून काम करतील.

जिल्हा पातळीवर महिलांसाठी केंद्र (District Level Center For Women) मध्ये महिला सक्षमीकरणासाठी असलेले शासकीय कार्यक्रम, योजना आणि सेवा (बेटी बचाओ- बेटी पढाओ, One Stop Center, Women Helpline, महिला पोलीस स्वयंसहायक, स्वाधार, उज्वला इ.) संदर्भात माहितीचे एकत्रिकरण केले जाईल. तसेच ही माहिती या केंद्रांमार्फत जिल्ह्यायातील नागरिकांना (प्राधान्याने महिलांना) उपलब्ध केली जाईल. ही केंद्रे राज्यस्तर व तालुका/ गट यामधील दुवा म्हणून काम करणार आहे. तसेच महिला केंद्रीत योजनांच्या अंमजबजावणीसाठी स्थानिक प्रशासन, राज्य शासन आणि केंद्रिय महिला व बाल विकास मंत्रालय यांच्यामधील दुवा म्हणून काम करतील. सदर योजनेच्या अंमलबजावणी व देखरेखीकरिता राज्य व जिल्हा पातळीवर Task Force स्थापन करण्यात येणार आहेत. जिल्ह्यातील महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्र (DLCW) ची रचना/ भूमिका आणि जबाबदाऱ्या/ मनुष्यबळ निवड पध्दती- पात्रता निकष/ देखरेख यंत्रणा व आर्थिक तरतूद खालीलप्रमाणे राहील.

१) जिल्ह्यातील महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्र (DLCW) ची **रचना** खालीलप्रमाणे :-

जिल्हा पातळीवर महिलांसाठी केंद्र (District Level Center For Women) मध्ये ०३ व्यक्तींची कंत्राटी तत्वावर संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीमार्फत नियुक्ती करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम व वेतन | पदांची संख्या | शैक्षणिक पात्रता, अनुभव व वयोमर्यादा |
|---|---|---|---|
| १ | महिला कल्याण अधिकारी (गट प्रमुख) (₹ ३५,०००/- प्रतिमाह) | ०१ | • मानव्य शास्त्र (Master in the field of Humanities) आणि सामाजिक विज्ञान (Social Science) क्षेत्रातील पदव्युत्तर पदवी. / समाजकार्यातील पदव्युत्तर पदवी, महिला केंद्रित योजना व कार्यक्रमांच्या अंमलबजावणी बाबत जाणीव असणे. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | • स्थानिक भाषेमध्ये संवाद साधण्याची क्षमता आणि जिल्ह्यातील अधिकाऱ्यांशी संपर्क साधण्याची क्षमता.<br>• नागरी समाज संघटनामध्ये कामकाजाचा पूर्वानुभव.<br>• संगणकीय अहवाल लेखनातील व MIS मधील नैपुण्य.<br>• वयोमर्यादा कमाल ३५ वर्षे असेल.<br>• संबंधित जिल्हयातील रहिवासी असावा.<br>• महिला उमेदवारास प्राधान्य देण्यात येईल. |
| २ | जिल्हा समन्वयक (₹२०,०००/- प्रतिमाह) | ०२ | • मानव्य शास्त्र (Master in the field of Humanities) आणि सामाजिक विज्ञान (Social Science)/ समाजकार्य किंवा इतर कोणत्याही क्षेत्रातील पदवी.<br>• जिल्हयातील महिलांविषयी समस्यांची जाणीव असावी.<br>• संगणक हाताळता यावा.<br>• वयोमर्यादा कमाल ३५ वर्षे असेल.<br>• संबंधित जिल्हयातील रहिवासी असावा.<br>• महिला उमेदवारास प्राधान्य देण्यात येईल. |

२) **निवड समिती :-** महिला कल्याण अधिकारी (गट प्रमुख) व जिल्हा समन्वयक या पदांची निवड करण्याकरिता संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे निवड समिती गठीत करण्यास जिल्हाधिकारी यांना मान्यता देण्यात येत आहे.

- जिल्हाधिकारी - अध्यक्ष
- महिला प्रश्नविषयक कार्यरत नागरी समाज संघटनांचे प्रतिनिधी - २ सदस्य
- महिला प्रश्नविषयक कार्यरत अशासकीय संघटनांचे प्रतिनिधी - *३ सदस्य
  (*http://ngodarpan.gov.in या NGO Portal वर नोंदणीकृत अशासकीय संघटनांचे प्रतिनिधी)

३) **महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्र (DLCW) च्या भूमिका आणि जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील :-**

i. शासकीय योजना, कार्यक्रम आणि सेवा (पात्रता निकष, आवश्यक कागदपत्रे, कार्यान्वयन अवधी, लाभ, अर्जाची सद्यस्थिती पाहण्याची पध्दती इ.) यांच्या संदर्भातील अद्ययावत माहिती बँक/ संग्रह तयार करणे.

ii. ही केंद्रे प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र योजनेच्या अंमलबजावणीसाठी आणि बेटी बचाओ- बेटी पढाओ योजनेला भक्कम पाठबळ पुरविण्याच्या दृष्टीने राज्यस्तर व तालुका/ गट यामधील दुवा म्हणून काम करणार आहे.

iii. ही केंद्र गट/ तालुका स्तरावरील विद्यार्थी स्वयंसेवकांच्या उपक्रमांचे समन्वयन आणि संनियंत्रण करतील.

iv. विविध शासकीय योजनांचे उपयोजन करताना महिलांना भेडसावणाऱ्या अडचणी ओळखून त्याचे कागदोपत्री अभिलेखीकरण करणे व त्यावर उपाय करण्यासाठी त्याचा अहवाल जिल्हाधिकारी कार्यालय / पंचायत राज संस्था यांना पाठविणे.

v. आंतरविभागीय एकत्रिकरणातून प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने बैठकांचे आयोजन करणे. महिला सक्षमीकरणावर प्रभाव पाडणाऱ्या घटकांचा (उदा. इतर सामाजिक, आर्थिक) विचार केला जाईल.

vi. केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय यांच्या योजनेतील उद्दिष्टानुसार साध्य करावयाची ध्येये आणि अंमलबजावणीची कालबध्द आखणी यांचा विचार करुन स्थानिक संदर्भात जिल्हा स्तरीय आराखडा तयार करणे.

vii. योजना/ कार्यक्रम, प्रशिक्षण यांच्यावर देखरेख करणे.

viii. जिल्हयात राबविल्या जाणाऱ्या सर्व महिला केंद्रित कार्यक्रम/ योजना यांचा डेटाबेस तयार करणे व जतन करणे.

ix. उपक्रमांचा प्रगती अहवाल महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (SRCW) यांना दरमहा पाठवावा.

x. केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय/ राज्य शासन यांनी निर्दिष्ट केलेल्या कृतीबाबत कार्यवाही करणे.

४) **जिल्हास्तरीय देखरेख यंत्रणा :-**

**जिल्हास्तरीय कार्यगट (District Level Task Force) :-** जिल्हास्तरीय कार्यगट जिल्हास्तरीय महिलांसाठी केंद्र (DLCW) याचे समन्वयन, देखरेख, आढावा, कार्य सुधारणा, निरीक्षण याबाबत कामकाज यासाठी जबाबदार राहील. सदर जिल्हास्तरीय कार्यगट आपल्या कामकाजाचा अहवाल केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय/ राष्ट्रीय कार्यगट/ राज्यस्तरीय कार्यगट यांना सादर करेल. जिल्हास्तरीय कार्यगटाची रचना पुढीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| २) | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.) महिला व बाल | - सदस्य सचिव |
| ३) | गट / सहायक गट विकास अधिकारी | - सदस्य |

- जिल्हास्तरीय माहिती केंद्रातील अधिकारी यांच्या उपस्थिती आणि कामगिरी विषयक अहवाल जिल्हाधिकारी कार्यालयात जतन केला जाईल.

- जिल्हास्तरीय माहिती केंद्रातील अधिकाऱ्यांनी राबविलेल्या उपक्रमांबाबतचा मासिक अहवाल केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय/ राज्यस्तरीय महिलांसाठी माहिती केंद्र (SRCW) यांना सादर करावा.

**५) आर्थिक तरतूद :-** महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्र (DLCW)साठी केंद्र शासनाच्या अंमलबजावणी मार्गदर्शिकेनुसार खालीलप्रमाणे वार्षिक खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| **प्रती महिला जिल्हास्तरीय माहिती केंद्र (DLCW) साठी आर्थिक विवरणपत्र (वार्षिक)** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **शीर्ष** | **पदांची संख्या** | **प्रतिमाह वेतन (रुपये)** | **वार्षिक तरतूद (रुपये)** |
| १ | महिला कल्याण अधिकारी | ०१ | ३५,००० | ४,२०,००० |
| २ | जिल्हा समन्वयक | ०२ | २०,००० | ४,८०,००० |
| | **अनावर्ती खर्च :-** | | | |
| १ | आस्थापना विषयक इतर खर्च | | | १,००,००० |
| | **आवर्ती खर्च :-** | | | |
| १ | कार्यालयीन खर्च | | | ५०,००० |
| २ | स्थानिक प्रवास खर्च | | १०,००० | १,२०,००० |
| ३ | संपर्क साधनांसाठीचा खर्च | | ५,००० | ६०,००० |
| | **एकूण वार्षिक प्रतिजिल्हा केंद्र खर्च** | | | **१२,३०,०००** |

**क) महिला शक्ती केंद्र (गट/ तालुका स्तर)** Mahila Shakti Kendra (MSK Block):- निती आयोगाने निवड केलेल्या राज्यातील नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली या ०४ आकांक्षित जिल्हयांमधील प्रत्येकी ८ गट/ तालुका स्तरावर महिला शक्ती केंद्र स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. जर एखाद्या जिल्हयामध्ये ८ पेक्षा कमी तालुके असतील तर निवड केलेल्या अन्य जिल्हयात ८ पेक्षा जास्त म्हणजेच उर्वरीत तालुक्यांचा समावेश करता येईल.

सदर महिला शक्ती केंद्रे ही विद्यार्थी, स्वयंसेवकांच्या योगदानातून समुदाय सहभागाव्दारे ग्रामीण महिला सक्षमीकरणाचे उद्दिष्ट साध्य करण्याकरिता स्थापन करण्यात येतील. यामध्ये निवड करण्यात आलेले विद्यार्थी स्वयंसेवक विविध शासकीय योजना/ कार्यक्रम आणि सामाजिक मुद्दे व त्याबाबत जागृती निर्माण करण्यात महत्वाची भूमिका पार पाडतील. ग्रामीण महिलांकरिता प्रशिक्षण, क्षमता बांधणी, शासकीय योजना कार्यक्रम यांच्या माध्यमातून माहिती व ज्ञान यातील तफावत कमी करण्याचे प्रयत्न करतील. यामधील विद्यार्थी स्वयंसेवक हे परिवर्तनाचे दूत म्हणून काम करणार असून त्यांच्यामार्फत ग्रामीण भागातील महिलांच्या समुदायावर कायमस्वरुपी प्रभाव पाडणार आहेत.

निवड झालेल्या गट/ तालुक्यातील सर्व ग्रामपंचायत/ अंगणवाडी केंद्रांचा समावेश संबंधित महिला शक्ती केंद्रामध्ये केला जाईल. आशा, अंगणवाडी सेविका, ANM सामूहिक सेवा केंद्रे, महिला बचत गट, बँक साथी, शिक्षा मित्र, कृषी मित्र, लोकनिर्वाचित महिला प्रतिनिधी, संरक्षण अधिकारी, महिला पोलीस स्वयंसेवक, न्यायमित्र यासारख्या आघाडीच्या कार्यकर्त्यांच्या सेवा एकत्रितरित्या विद्यार्थी स्वयंसेवकाव्दारा ग्रामपंचायत पातळीवर पुरविल्या जातील. महिला शक्ती केंद्र योजनेचा भाग म्हणून प्रशिक्षण आणि क्षमता बांधणीचे कार्यक्रम खालील घटकांच्या अनुषंगाने राबविले जातील.

१. सदर प्रशिक्षण मोड्यूलची आखणी करताना वेगवेगळे हितसंबंध असणाऱ्या घटकांचा विचार करण्यात येईल. (जसे. लोकनिर्वाचित प्रतिनिधी, शासकीय अधिकारी, स्टाफ, एकत्रित महिला सदस्य, व्यक्तीनिहाय घटक इ.)
२. प्रशिक्षणासाठी आवश्यक घटक. (जाणीव निर्मिती, संवेदनशिलता, तांत्रिक कौशल्य, वागणूकीतील बदल.)
३. प्रशिक्षण देण्याची पध्दती (प्रत्यक्ष किंवा एजन्सी मार्फत)

गट/ तालुका स्तरावरील महिला शक्ती केंद्राचे व्यवस्थापन तालुका स्तरीय समितीमार्फत केले जाईल.

I. **तालुका / गट स्तरीय समिती** (Block Level Committee) :- तालुका स्तरीय समिती ही तालुका स्तरीय उपक्रमांचे प्रतिनिधित्व करेल, आणि ती पंचायत समिती कार्यालयाच्या आवारात कार्यरत राहील.

तालुका/ गट स्तरीय समिती (Block Level Committee) ची रचना/ भूमिका आणि जबाबदाऱ्या/ मनुष्यबळ निवड पध्दती- पात्रता निकष/ देखरेख यंत्रणा व आर्थिक तरतूद खालीलप्रमाणे राहील.

१) **रचना** :- तालुका/ गट स्तरीय समिती (Block Level Committee) ची **रचना** खालीलप्रमाणे :-

i. जिल्हाधिकारी नामनिर्देशित जिल्हा कार्यालयातील प्रतिनिधी - ०१ सदस्य
ii. जिल्हाधिकारी नामनिर्देशित तालुका/ गटातील महाविद्यालयातील अध्यापक वर्गातील प्रतिनिधी - ०४ सदस्य*
iii. जिल्हाधिकारी नामनिर्देशित तालुक्यातील शासकीय प्रतिनिधी - ०१ सदस्य
iv. जिल्हाधिकारी व्दारा नामनिर्देशित नागरी सेवा संघटन/ महिला स्वयंसहायता गट -०२ सदस्य

(* प्रशासकीय विभागाव्दारा नामनिर्देशित तालुका/ गटातील महाविद्यालयातील अध्यापक वर्गाची नियुक्ती करताना कोणताही अध्यापक एकापेक्षा जास्त तालुकास्तरीय समितीचा सदस्य असता कामा नये. तरीही महाविद्यालयांची किंवा पात्र अध्यापक वर्गाची कमतरता असल्यास जिल्हाधिकारी एकाच अध्यापकास एकापेक्षा अधिक तालुकास्तरीय समितीवर नामनिर्देशन करु शकतात. अशा प्रकरणी त्या सदस्यास केवळ एकाच तालुका स्तरीय समितीकडून मानधन मिळेल.)

२) **तालुका/ गट स्तरीय समिती** (Block Level Committee) **ची कार्ये पुढीलप्रमाणे :-**

i. निवड झालेल्या तालुक्यातील विविध महाविद्यालयातून २५ महाविद्यालयीन विद्यार्थी यांचा समावेश असणाऱ्या जास्तीत जास्त ८ तुकड्या तालुका स्तरीय समिती तयार करेल. त्यानुसार एकूण २०० विद्यार्थ्यांची निवड केली जाईल. त्यापैकी पहिल्या सहामाही करिता १०० विद्यार्थ्यांना संधी देण्यात येऊन उर्वरीत सहामाही कालावधीसाठी उर्वरीत १०० विद्यार्थ्यांना संधी देण्यात यावी. पहिल्या सहामाहीतील निवड केलेल्या विद्यार्थ्यांची दुसऱ्या सहामाहीकरिता निवड करण्यात येऊ नये.
ii. निवड करावयाच्या विद्यार्थी स्वयंसेवकामध्ये NCC/ NSS विद्यार्थ्यांचा देखील समावेश केला जाईल. त्यात प्राधान्याने विद्यार्थीनींची निवड करणे अपेक्षित आहे. पात्र प्रकरणात इ.१० वी व १२ वी मधील विद्यार्थीनींची देखील निवड करण्यात येईल.

iii. गट/ तालुका स्तरावरील समिती विद्यार्थी स्वयंसेवकाकरिता प्रशिक्षण आणि क्षमता बांधणी कार्यक्रमांचे आयोजन करेल.

iv. विद्यार्थी स्वयंसेवकांना विविध शासकीय योजना आणि कार्यक्रमांबाबत अभिमुखता प्रशिक्षण दिले जाईल. स्थानिक महिलांच्या गरजा आणि उपलब्ध संसाधने विचारात घेता विद्यार्थी स्वयंसेवकांना अभिमुखता प्रशिक्षण देण्याकरिता गट/ तालुका स्तरीय समिती संस्था किंवा स्वयंसेवी संस्था यांची निवड करेल. एका तुकडीला कमीत कमी ०३ दिवसाचे प्रशिक्षण दिले जाईल.

v. प्रत्येक विद्यार्थी ६ महिन्याच्या कालमर्यादेत कमाल २०० तास समुदाय सेवा करेल. समुदाय सेवेकरिता ₹५०/- प्रती तास इतके विद्यावेतन देण्यात येईल.

vi. २०० तास सामुदाय सेवा पूर्ण झाल्यानंतर प्रत्येक विद्यार्थ्यास जिल्हाधिकारी यांच्याव्दारे स्वाक्षरीत समुपदाय सेवा प्रमाणपत्र दिले जाईल.

vii. समितीतील अध्यापक हे विद्यार्थी स्वयंसेवकांच्या उपक्रमांना मार्गदर्शन तसेच त्यावर देखरेखीचे कार्य करतील.

viii. समितीतील अध्यापक वर्गाच्या प्रतिसादानुसार फलनिष्पत्तीचे निर्देशांकासंदर्भात माहिती संकलित करुन जिल्हास्तरीय कार्य गटाकडे पाठविण्यात येईल.

ix. जिल्हा पातळीवर महिलांसाठी केंद्र (District Level Center For Women) कडे विद्यार्थी स्वयंसेवकांव्दारे पाठवावयाच्या माहितीचे संकलन गट/ तालुका स्तरीय समिती करेल.

x. तालुका स्तरीय समिती एका भौगोलिक क्षेत्रातील विद्यार्थी स्वयंसेवकाव्दारे केले जाणारे उपक्रम किंवा प्रयत्नात पुनरावृत्ती होणार नाही, याची खातरजमा करेल.

xi. विद्यार्थी स्वयंसेवकाव्दारा प्रसारासाठी IEC साहित्याची निर्मिती तालुका स्तरीय समिती करेल. तयार केलेल्या IEC साहित्यात जिल्हा/ राज्य/ राष्ट्रीय स्तरावरील सर्व योजनांचा पुरेसा समावेश झाल्याची खातरजमा तालुका स्तरीय समिती करेल. तसेच त्याबाबत विद्यार्थी स्वयंसेवकांना अभिमुख करेल.

xii. जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यगटाच्या (DLTF) मार्गदर्शनाखाली तालुका स्तरीय समिती काम करेल.

II **महिला शक्ती केंद्र (MSK) :-** गाव पातळीवर महिला शक्ती केंद्र गट (MSK Block) तसेच विद्यार्थी स्वयंसेवकांसाठी अंगणवाडी केंद्र/ ग्रामपंचायत कार्यालय हे संपर्काचे स्थान म्हणून कार्यरत राहील.

१) **महिला शक्ती केंद्राची (गट/ तालुका स्तर) Mahila Shakti Kendra (MSK Block) कार्ये :-**

i. पंचायत राज संस्था तसेच गाव पातळीवरील ग्रामसभा, अंगणवाडी केंद्रे यासारख्या संस्थांमध्ये महिलांचा प्रभावी सहभाग वाढवणे.

ii. महिलांना ग्रामसभा बैठकीमध्ये उपस्थित राहण्याबाबत प्रोत्साहित करणे.

iii. शासकीय योजना, कार्यक्रम, सेवा यांच्याबाबत आघाडीच्या कार्यकर्त्यांव्दारे (आशा, अंगणवाडी सेविका इ.) सेवा एकत्रितरित्या पुरविणे आणि ग्रामीण महिलांच्या विकासासाठी असणाऱ्या विविध योजनांमध्ये सहभाग नोंदविण्यासाठी त्यांना उत्तेजन देणे. तसेच त्यांचा सहभाग वाढविणे.

iv. आधार, मनरेगा, दारिद्र्य/ सामाजिक, आर्थिक सर्वेक्षण इ. यासारख्या अस्तित्वात असणाऱ्या शासकीय यंत्रणांव्दारे महिलांना लाभ मिळवण्यासाठी आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करण्यास मदत करणे.

v. बेटी बचाओ- बेटी पढाओ योजनेच्या अंमलबजावणीसाठी महिलांसाठी जिल्हास्तरीय केंद्रांना (DLCW) सहाय्य करणे.

vi. पंचायत, One Stop Center, Village Health Sanitation & Nutrition Committee/ Village Health & Nutrition Day (VHSNC/ VHND) यासारख्या योग्य अभिकरणांव्दारे प्राप्त तक्रारींच्या निवारणासाठी सहाय्य करणे.

vii. त्याच गटात कार्यरत असणाऱ्या इतर स्थानिक नागरी समाज संघटन/ अशासकीय संघटन आणि त्यांचे कर्मचारी यांच्यासोबत समन्वय साधणे.

viii. इतर विविध योजनांखाली सर्वात प्राथमिक स्तरावर कार्यरत असणाऱ्या महिला स्वयंसहायता गट/ इतर महिला समूह यांच्यातील समन्वय वृध्दीकरण करणे.

ix. लिंगभाव विषयक दृष्टीकोनातून आरोग्य, शिक्षण, सुक्ष्म वित्त, राहणीमान उंचावणे इ. बाबत सर्वोत्तम पध्दती (शासन, नागरी समाज संघटन, पंचायत राज संस्था) ओळखणे.

२) **महिला शक्ती केंद्राची (गट स्तर) Mahila Shakti Kendra (MSK Block) देखरेख यंत्रणा :-**

i. शंका, प्रतिसाद, तक्रार निवारण यासाठी Web Based/ Online प्रतिसाद यंत्रणा विकसित केली जाईल.

ii. विद्यार्थी स्वयंसेवकांना Web Based उपक्रम तक्त्यात माहिती एकत्रितरित्या तालुका स्तर आणि जिल्हा स्तरावर आणि शेवटी राज्य स्तरावर पाठविणे आवश्यक राहील.

३) **आर्थिक तरतूद :-** महिला शक्ती केंद्राची (गट/ तालुका स्तर) (MSK Block) केंद्र शासनाच्या अंमलबजावणी मार्गदर्शिकेनुसार खालीलप्रमाणे वार्षिक खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| **महिला शक्ती केंद्राची (गट/ तालुका स्तर) Mahila Shakti Kendra (MSK Block) आर्थिक विवरणपत्र (वार्षिक)** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **मानधन** | **पदांची संख्या** | **प्रतिमाह (रुपये)** | **वार्षिक खर्च (रुपये)** |
| १ | जिल्हाधिकारी नामनिर्देशित गटातील महाविद्यालयातील अध्यापक वर्गातील प्रतिनिधी | ०४ | ३,००० | १,४४,००० |
| २ | जिल्हाधिकारी नामनिर्देशित जिल्हा कार्यालयातील प्रतिनिधी | ०१ | २,००० | २४,००० |
| ३ | विद्यार्थी स्वयंसेवक | २०० | *₹५०/- प्रतीतास सामाजिक सेवा विद्यावेतन | २०,००,००० |

| | | |
|---|---|---|
| | **अनावर्ती खर्च :-** | |
| १ | आस्थापना विषयक इतर खर्च (संगणक, संगणक प्रणाली, प्रिंटर, लॅपटॉप, कॅमेरा इ.) | ३,००,००० |
| | **आवर्ती खर्च :-** | |
| १ | कार्यालयीन खर्च (भाडे, सेवा, संणक प्रणाली यांच्यासह) | २,००,००० |
| २ | कार्यक्रम/ उपक्रम खर्च- बैठका, कार्यशाळा, प्रशिक्षण, सल्ला विनिमय, साधन व्यक्तींचे संघटन इ.) | ३,००,००० |
| ३ | (Information, Education & Communication) IEC साहित्य | ४,००,००० |
| ४ | Flexi Fund (DLTF व्दारा निर्धारित) | १,६८,००० |
| | **एकूण वार्षिक महिला शक्ती केंद्र (गट/ तालुका स्तर) खर्च** | **३५,३६,०००** |
| * २०० तास = २५ दिवस (८ तास प्रतिदिवस). ₹५०/- प्रतीतास या हिशोबाने ₹४००/- प्रतीदिन (₹५०/- X ८ तास) यात ₹३००/- प्रतिदिवस + ₹१०० प्रवासखर्च. | | |

४) **फल निष्पत्ती निर्देशांक :-** गट/ तालुका स्तरीय समितीतील (BLC) अध्यापक प्रतिनिधी फलनिष्पत्तीचे निर्देशांकासंदर्भात खालील माहिती संकलित करुन जिल्हास्तरीय कार्य गटाकडे पाठवतील.

i. निवड केलेल्या गट/ तालुक्यात महिला शक्ती केंद्राच्या उपक्रमांच्या माध्यमातून किती टक्के महिलांपर्यंत संपर्क साधला.

ii. संपर्क साधलेल्या महिलांपैकी किती टक्के महिलांनी सेवांची मागणी केली.

iii. सेवांची मागणी केलेल्या/ अशा सेवेची गरज असलेल्या एकूण महिलांपैकी किती टक्के महिलांपर्यंत शासकीय योजनेचा लाभ/ सेवा मिळाली.

३. केंद्र पुरस्कृत महिला शक्ती केंद्र योजनेंतर्गत महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (State Resource Center for Women- SRCW) ही यंत्रणा गठित करण्यात येत आहे. त्यामुळे दि.१७.०८.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय महिलांचे सक्षमीकरण मिशन (National Mission for Empowerment of Women- NMEW) अंतर्गत महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (State Resource Center for Women- SRCW) प्रत्यक्षात कार्यान्वित झाले नसल्याने संदर्भाधीन शासन निर्णय क्र.महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१०/प्र.क्र.२१७/का.२, दि.१७ ऑगस्ट, २०१८ अधिक्रमित करण्यात येत आहे. तसेच केंद्र शासनाकडून राष्ट्रीय महिलांचे सक्षमीकरण मिशन (National Mission for Empowerment of Women- NMEW) अंतर्गत महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (State Resource Center for Women- SRCW) साठी प्राप्त झालेल्या अनुदानाचा अद्यापपर्यंत प्रत्यक्षात विनियोग झालेला नसल्याने सदर निधी पुर्नजीवित करुन केंद्र पुरस्कृत महिला शक्ती केंद्र योजनेंतर्गत महिलांसाठी राज्यस्तरीय माहिती केंद्र (State Resource Center for Women- SRCW) करिता वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र योजनेसाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र व राज्य हिश्श्यापोटी (६०:४० प्रमाणात) अनुक्रमे ₹९,११,४८,७००/- व ₹६,०७,६५,८००/- अश्या एकूण ₹१५,१९,१४,५००/- इतक्या वार्षिक खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

५.    केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र योजनेसाठी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना या योजनेचे राज्यस्तरावरील नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्यामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी.

६.    केंद्र शासनाच्या अंमलबजावणी मार्गदर्शिकेनुसार या योजनेंतर्गतची सर्व देयके PFMS Under DBT Mode व्दारे संबंधित यंत्रणांना उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने नियंत्रक अधिकारी यांनी योग्य ती कार्यवाही करावी.

७.    केंद्र पुरस्कृत नवीन प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र योजना यासाठी येणारा खर्च केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात यावा, व याबाबतचे लेखे स्वतंत्र ठेवून खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व खर्चाचे वार्षिक विवरणपत्र (UC & SOE) याचा तपशील वेळोवेळी केंद्र शासनाच्या संबंधित मंत्रालयाकडे व या विभागाकडे पाठविण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

८.    सदर शासन निर्णय नियोजन विभागच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७७/१४७२, दि.१६.०५.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११२/१४७, दि.२९.०६.२०१८ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२९१५२१२३६६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.01.29 15:33:53 +05'30'

**(स्मिता निवतकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
३. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. मा.मंत्री, नियोजन/ वित्त विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
१०. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालयामार्फत)
१२. सर्व जिल्हाधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१३. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१४. सर्व कार्यासने, महिला व बाल विका विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती, का-१०.